**राज्यातील आजारी /बंद सहकारी साखर कारखान्यांना पुनरुज्जीवनासाठी विशेष उपाय योजना करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन,**
**वित्त विभाग**
**मंत्रालय,मुंबई-४०००३२,**
**शासन निर्णय क्रमांक-उखक-२०११/प्रक्र.८४/कराधान-३,**
**दिनांक: १३ मे, २०११**

**प्रस्तावना:-**

राज्यात एकूण २०२ साखर कारखाने आहेत. त्यापैकी एकूण १६३ साखर कारखाने सहकार क्षेत्रात आहेत. विविध कारणांमुळे राज्यातील एकूण ५२ साखर कारखाने बंद पडलेले आहेत. सदर कारखाने चालू राहाणे, हे शेतक-यांच्या व साखर कारखान्यातील कर्मचा-यांच्या तसेच एकूण ग्रामीण अर्थकारणाच्या दृष्टीने हितावह आहे.

आजारी/बंद परंतु पुनरुज्जीवाक्षम असलेल्या साखर कारखान्यांना सदर कारखाना हस्तांतरित करण्याची परवानगी देण्यात आल्यास अशा साखर कारखान्यांना त्याची देणी देता येतील. तसेच मालमत्तेचा वापर नवीन घटकांना पुन्हा उत्पादन करण्यास उपयोगी पडेल व वापरविना पडून असलेली मालमत्ता उत्पादनात आणता येईल. याशिवाय आजारी/बंद पडलेल्या साखर कारखान्यांकडून वसूल होणारी रक्कम वसूल होवून शासनास जादा महसूल मिळेल. परंतु अशा कारखान्यांकडे असलेला थकीत कर व त्यावर आकारलेले व्याज व दंडाची रक्कम मोठी असल्याने नवीन गुंतवणूकदार उद्योग घटक पत्करण्यासाठी पुढे येत नाहीत. अशा आजारी/बंद पडलेल्या साखर कारखान्यांचे हस्तांतरण व पुनरुज्जीवन शक्य व्हावे याकरिता विशेष उपाययोजना शासनाच्या विचाराधीन होती.

त्याअनुषंगाने शासनाने खालील प्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय:-**

आजारी/बंद पडलेले साखर कारखाने यांनी पुनरुज्जीवन कार्यक्रमांतर्गत कारखान्याकडे असलेली विक्रीकर, मूल्यवर्धित कर, केंद्रीय विक्रीकर, ऊस खरेदीकर व

व्यवसायकर याची थकीत मूळ रक्कम एक रकमी संपूर्णतः भरल्यास त्यावर आकारलेल्या दंड व व्याजाची रक्कम पूर्णतः माफ करण्यात येईल, याबाबतच्या अटी व शर्ती पुढील प्रमाणे आहेत.

**अटी व शर्ती :-**

१) सदर योजना दि. १/४/२०११ पासून १ वर्षाकरिता लागू राहील.

२) सदर योजना ही ज्या कारखान्यांचे नक्त मूल्य उणे झाले आहे व ज्या कारखान्यांनी मागील तीन वर्षात ऊसाचे गाळप केलेले नाही असे आजारी साखर कारखाने या योजनेचा लाभ घेण्यास पात्र असतील.

३) सदर योजनेचा लाभ घेण्यासाठी सदर आजारी/बंद साखर कारखान्यांची असलेली संपूर्ण मूळ रक्कम (दंड व व्याज सोडून) योजनेच्या कालावधीत भरणे आवश्यक आहे.

४) उपरोक्त उल्लेख केलेल्या सर्व करांचा भरणा केल्याच्या पुराव्यासह अर्जदाराने विक्रीकर विभागाकडे अर्ज करावा.

५) देय कराबाबत अपिल दाखल केलेले असल्यास, असे अपिल बिनशर्त मागे घेतल्यानतर आणि तसा अपिल आदेश पारित झाल्यानंतरच प्रस्तुत धोरणाचा लाभ मिळेल.

६) या योजनेअंतर्गत विक्रीकर, मूल्यवर्धित कर, केंद्रीय विक्रीकर, ऊस खरेदीकर व व्यवसायकर अधिनियमांखालील कार्यवाही करण्याचे सर्व अधिकार विक्रीकर आयुक्त, मुंबई यांना देण्यात येत आहेत. सदर अधिकार विक्रीकर आयुक्त विभागातील कनिष्ठ अधिका-यांना पुन:प्रदान करु शकतील.

७) सदर योजना अंमलात येण्यापूर्वी संबंधित साखर कारखान्यांनी त्यांच्याकडील मूळ कर, शास्ती व व्याज याचा भरणा केला असल्यास या योजनेखाली लाभ घेता येणार नाही.

८) या योजनेखाली भरलेल्या रकमेसंबंधी परतावा मिळणार नाही.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या

संकेतस्थळावर प्रसिध्द करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०११०५१३१२५७४६००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

भांगडीया
१३।५।११
( ओ.चै. भांगडीया )
उप सचिव,वित्त विभाग

प्रति:-

१) सचिव(सहकार), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
२) विक्रीकर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, विक्रीकर भवन, माझगांव, मुंबई-४०० ०१०.
३) अपर विक्रीकर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, विक्रीकर भवन, माझगांव, मुंबई-४०० ०१०.
४) सर्व विक्रीकर उपआयुक्त, महाराष्ट्र राज्य, विक्रीकर भवन, माझगांव, मुंबई-४०० ०१०.
५) प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा)-१, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६) प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा)-२, महाराष्ट्र राज्य, नागपूर.
७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई.
८) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर.
९) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१०) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
११) कार्यासन अधिकारी, व्यय-२, अर्थसं.३,७, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१२) निवड नस्ती, कराधान-३